ति—बाबा, ह्ये न्हाई माज्या बाच्यानं व्हनार.

राव—तुज्या बाच्यानं व्हतं ह्मून तर मी तुला सांगतुया. आन् ोस व्हनार न्हाई ह्मून. बापापुनबी ब्येटा श्येना.

पति—मी अक्षी उगडउगड सांगतुया--

डेराव—ह्ये काय ल्येका, ल्येडगळावानी उगडंन् नागडं करीत हैस ? शेरच्या इद्वानावानी सपस्ट असं ह्मन. ह्येलाच सवंस्कुत्र त. वंगाळ असलं तरीबी त्ये सवंस्कुत्रामंदी ह्मंतलं मंजी ग्वाड दिसतं. अन्याव ह्मनतो न्हव, त्येलाच त्ये बोलींत ह्मनत्यात न्याव ! ला ह्मनत्यात ग्यान, आन् इस्कुलाला बी ह्मनत्यात स्कूल ! असा समदा उपराटा परकार ! म्हून वंगाळ काम करावं ह्मराटीमंदी बोलावं सवंस्कुत्रामंदी; मंजी द्येवाह्मोर त्येच समद गुन्ह माफ ! समदा धरम हाय सवंस्कुत्रामंदीच.

पति—हत संमदीं वंगाळच कामं कराया व्होवींत ह्मनता ?

डेराव—अडानी र अडानी ! अक्षी बिचाकला प्वोर. प्वोरा, तुला काम व्होवं ह्मनतुयास ? थांब वाइच. आलं माज्या ध्येनांत. ा, तुला परथम वागावानी धीट कराया व्होवं. आसं न्हाइ क्येलं ग ह्मोर भागूबाई व्हयाचा ! त्वां कंदी मसनवाट पघितली हैस ?

ोपति—आन् रोजच्यारोज पगतुया न्हव का ?

डेराव—हीं ल्येड्यांतली मसनवाट न्हव; शेरामंदली हाय ! हत ळ, राकुस, हडळी, डकूनी आन् जखनी, उपराव्या पायानी रातचा नाचत्यात, आन् मनुक्षाला गट करत्यात. ल्येड्यावानी गरीब भुतं हैती.

ोपति—मंग तर हतं लई गंमत पगाया गवासनार आमास्नी ! र कंदीबी भूत पाह्यलं न्हाई.

डेराव—तुला भ्या न्हाइ वाटायचं ?

ोपति—आन् भ्या त्ये कशापायी ?

खंडेराव—अक्षी ख्येडगळ हैस ! म्येवं कशाला त्येवी न्हाई ! थू: तुज्या जिनगानीवर ! पन् ह्येबी ठीक जालं ! परवां मद्यानरात्च्या पारीं तुला मसनवटांत जाया ऱ्होवं.

श्रीपति—मी तर सांजपुनच ततं जाऊन बसतों.

खंडेराव—ह्ये तर समद्यापुन ब्येस ! ह्ये बग, ततं कोन येतं बोलतया ह्ये ध्यान ठिवून बगून घ्ये, आन् अक्षी प्हाटंच मला इयान सांग.

श्रीपति—आन् मद्रातीच्या भरवख्तीं मला झ्वाप लागलं तर कसं ?

खंडेराव—मसनवाटींत तुला झ्वाप लागल व्हय ? अन् तं कशाला घ्येकनार ?

श्रीपति—आन् ततं अर्दमुर्द जळल्याल मुरद कमीच असत्यात.

खंडेराव—वार माजा वाग ! सोबतुयास खरा माजा मुलगा. आतां मी सांगतु तसं कर. मद्यानीपोतुर उब्याउब्यानं ऱ्हातो मसनवाटीमंदी प्हारा कर, आन् कोन काय करतया त्ये ह्येरूनशान आन् मंग उशापायथ्याप ऱ्होव तिकृत मुडद घ्येउनश्यान् खुशाल टेंकवानी निजून ऱ्हा ! थंड वाजाया लागली तर येकांद्या मुडद्याचं कला कर; माजी ना न्हाई. पर हो; ह्ये पग; येवडं घ्येनांत घ्येव ! उमगू देऊं नग का ततं मी है कां तूं हैस आसं. मीच ततं है

श्रीपति—त्येची काई फिकर न्हाई बगा ! तोंडावरनं मुडदा घ्येतला का काम श्याप ! ( स्वगत ) कुनाच्या बालाबी यचं न्हाई का ती मुडद्याची कळा हाय का माझ्या बाची सून

---

## प्रवेश पांचवा.

[ धुरंधर, वाराणशी, गंगू, यमुना, त्रिवेणी. ]

राणशी—अहो जोशीबुवा, तुमच्या भाकिताबद्दल आज सगळें ाखाणणी करीत आहे. पण तुमच्या चातुर्याचा आह्मांला मात्र मासला पहावयाला मिळाला नाहीं.

ंधर—याचें एक कारण असें, कीं आपल्या मुलीसारख्या ज्या ीय सुंदर युवति असतात त्यांच्या हातांवरील रेषांपेक्षां रूपरेषे- व त्यांच्या भावी उत्कर्षाची अटकळ बांधिता येते; व तें काम य जनांसहि साध्य असतें. दुसरें असें, कीं ज्याप्रमाणें वैद्याला ा आप्तांची रोगचिकित्सा शांत व निश्चल बुद्धीनें कारितां येत त्याप्रमाणें ज्योतिष्यासही आपल्या आश्रयदात्यांचें भविष्य बुद्धीचा लपणा ठेवून वर्तवितां येत नाहीं. याप्रमाणें आपल्या मुलीचें भविष्य सांगणें एका दृष्टीनें अनावश्यक व दुसऱ्या दृष्टीनें य आहे.

मुना—काकू, आपले जोशीबुवा हात पाहून भविष्य सांगण्या- तोंड पाहून बोलण्यांतच अधिक हुशार दिसतात, नाहीं बरें ?

ाराणशी—यमुने, तूं किनई बोलण्यांत एकाद्या पंडितालासुद्धां टेंकायला लावशील. तुला नवरा तुझ्यासारखा पंडितच शोधून ला पाहिजे.

मुना--ह्मणजे राजा नको असेंच ना तुमचें ह्मणणें ? मला तर यांत कमीपणा न वाटतां धन्यता वाटते. राजा किती जरी बलाढ्य , तरी त्याची सत्ता आपल्या राज्यापुरती. उलट पंडिताची सत्ता ा जगावर चालते.

ुरंधर—( एकीकडे ) असें स्पष्ट बोलणें मला राजा या नात्यानें च ऐकायला सांपडलें नसतें.

ाराणशी—यमुने, हीं बोलणीं कुठपर्यंत ? जोंपर्यंत धुरंधरमहाराज ी निवड करण्याकरितां समोर आले नाहींत, तोंपर्यंतच.

यमुना—धुरंधरमहाराज वधूची निवड करणार! आणि
मात्र आपला वर पसंत करण्याची चोरीच ! ही लग्नाची
तऱ्हाच ह्मणावयाची.

वाराणशी--तें सारें आतां महाराजानांच समक्ष सांग. घोडा
जवळच आहे.

यमुना--मी नाहीं भ्यायची मुळींच. तसाच प्रसंग आला?
त्यांना साफ सांगेन, कीं माझें आधींच लग्न झालें आहे.

वाराणशी--शर्थ झाली बाई तुह्मां शिकलेल्या बायकांची!
तूं सांगतेस हें खरेंच का ?

यमुना--मनानें वरिलें ह्मणजे आणखी लग्न तें काय ला
असतें ? मीं जरी हें नसतें सांगितलें तरी जोशीबुवा सांगितल्या
थोडेच रहाणार होते !

वाराणशी—जोशीबुवा, सांगा बरें हिनें मनानें कोणाला वर

धुरंधर—यांनीं हात दाखविला ह्मणजे सांगतों.

यमुना--मी नाहीं दाखवायची हात कुणाहि परक्या पुरुषा

धुरंधर—यमुनाताई, तुह्मी चुकतां. स्त्री कितीहि पवि
असली तरी तिला कांसाराला, वैद्याला आणि ज्योतिष्याला हात
वावाच लागतो.

यमुना--वैद्याला हात दाखविल्यावांचून माणसाचें चालत
तसें ज्योतिषाचें नसतें.

धुरंधर—मनुष्य रोगामुळें किंवा जिज्ञासेमुळें आतुर झाले
त्याला वैद्याचा काय किंवा ज्योतिष्याचा काय,आश्रय करावाच

यमुना—वैद्याकडून भविष्य चुकवितां येतें. ज्योतिषा
माहित करून घेतां येतें. मला दोन्ही गोष्टी नकोत आहेत.
भविष्य माहित आहे. तें तुह्मीं सांगून इतरांना मौज वाटेल
काय त्याचा फायदा ?

रंधर—भविष्य चुकविणें किंवा कळणें याची जितकी माणसाला असते, तितकीच भविष्य दृढ करून घेण्याचीहि असते. आपण करितां जो पति योजिला आहे, त्याचें आपणावर प्रेम आहे कीं हें कळणें निरुपयोगी खास नाहीं.

मुना—मीं एकदां तुह्माला सांगितलेंना कीं मी हात दाखविणार तेंच कायमचें समजा. माझी आपली झांकली मूठ सव्वा लाखाची तीच बरी आहे. तुह्मी एवढे ज्योतिषी ह्मणवितां, आणि मी हात वेणार नाहीं हें माहित असतां तुह्मी मला इतका आग्रह करितां, मला भारी नवल वाटतें. अशानें मला निराळ्याच अर्थानें हात लावा लागेल !

रंधर—(एकीकडे) भार्गवानें सांगितल्याप्रमाणें हट्टी स्वभाव आहे त.

राणशी—जोशीबुवा, हात न पाहतां नाहीं का सांगतां येणार ?

रंधर—अशीं माणसें भेटलीं तर त्यांचें भविष्य प्रश्नाच्या काळा- काढण्याचीहि सोय ग्रंथांतून केली आहे. घटिकेचें लग्न कळलें जे प्रश्नाचें उत्तर तयार !

मुना—हें मोठेंच सांगितलेंत ! लग्न कोणाचें, कोणाशीं, कोणत्या वर होणार हें कळलें, कीं मग राहिलें काय सांगायचें !

रंधर—हं, जमलें ! मी सांगतों यांनीं चिंतिलेला वर कसा आहे तो. गोरा, रूप सुंदर, प्रकृति सुदृढ, बुद्धि असामान्य. कां, जमतें कांहीं ?

गंगू—जोशीबुवा, या प्रश्नाला नाहीं असें का उत्तर येणार आहे याकडून ? प्रत्येक रमणीला आपला वल्लभ अगदीं याच वर्णनाचा तो. याहून निश्चयात्मक असें कांहीं सांगायचें असलें तर सांगा.

धुरंधर—परिचय फार दिवसांचा नसावा. एका आठवड्याच्या तीलच बहुधा असावा.

यमुना—जोशीबुवा, पुरे आतां ही थट्टा! दुसऱ्या कोणाचें नां
सांगायचें भविष्य ?

गंगू—आह्मांला तुह्मीं परिचयाचा काळ सांगितलात; पण
नाहीं अजून सांगितलेंत तें ?

यमुना—गंगूताई, पुरे कर बाई तुझा चावटपणा! जोशीबुवा,
गळ्याचीच शपथ आहे तुह्मांला आतां आणखी कांहीं बोलाल त

धुरंधर—तुमच्या कानांत सांगितलें तर ?

यमुना—हं, त्याला कांहीं हरकत नाहीं.

धुरंधर—(स्वगत) हिचें भार्गवावर प्रेम आहे कीं काय हें
ही संधि बरी आहे. (यमुनेच्या कानांत कुजबुजतो; ती दचकते.

वाराणशी—(एकीकडे) खास येथें कांहींतरी पाणी मुरतें आहे.
यमुने, बरें झालें बाई, तूं तरी लग्नाच्या विवंचनेंतून सुटलीस. (स्व
यमुनेचा तर बंदोबस्तच झाला. आतां ही कारटी त्रिवेणीच
माझ्या लाडकीच्या वाटेंत विघ्न आणणारी उरली आहे. लहा
पासून मुलीसारखी पोसली, नाहीं नाहीं ते लाड पुरविले, पण
आपल्या हलक्या कुळाच्या वळणावरच जायची. हिला एकदां
करीनसें झालें आहे. (उघड) जोशीबुवा, तुह्मीं हा जो चमत्कार
दाखविला, त्यानें माझी उत्कंठा फारच वाढली आहे. आमच्या या
लग्नाचें कसें काय जुळतें याची बाई मला पराकाष्ठेची काळजी लाग
कराल का ती दूर ?

धुरंधर—भविष्य सांगण्याचें माझ्या हातीं आहे, काळजी
ण्याचें नाहीं.

वाराणशी—(एकीकडे) हे मेले लागलीच हरभऱ्याच्या
चढतात! (उघड) हें पहा, तशी काळजी वाटायला मला कांहीं
आहेत, अशांतला कांहीं प्रकार नाहीं हो! तुह्मीच सांगा,
आणि असा बांधा असल्यावर मला काळजी कां वाटावी? पण ह्मण

नां हृदय ! त्यांतून कधीं कधीं साधारणच रूपाच्या पण नटव्या हलक्या कुळांतल्या पोरींनीं पुरुषांना मोह घातल्याच्या गोष्टी वर येतात, त्यामुळेंहि जरा धास्ती वाटते. गंगू, चल ये बाई अशी बुवांच्या जवळ. ( गंगू येते. ) एवढेंसें चालूनसुद्धां थकलीसना ? झाली बाई तुझ्या नाजूकपणाची ! राजाच्या महालांतल्या गाद्या रुजामे देखील तुला बोंचायचे. हा घाम तरी किती आला आहे! ीं निथळून गेलीस. जोशीबुवा, या नाजूक प्रकृतीमुळें माझ्या चा अभ्यासहि तितपत झाला नाहीं. त्रिवेणीसारख्या सामान्य पण प प्रकृतीच्या मुलींनींसुद्धां तिच्यावर यावें. यमुनेला मात्र तिनें कधीं ऊं दिलें नाहीं.

मुना—त्याला कारण माझाच हट्ट ! गुरुजींनीं सांगितला एक धडा ला, कीं मीं दुसराच करावा !

ाराणशी—अलीकडे हिला शालूपैठण्यांचें ओझें सोसत नाहीं, न ही बारीक पातळ नेसते, आणि पोलके घालते. वेणी किंवा बुचडा ला तर केंस आंवळ होतात ह्मणून ही आपले केंस असे मोकळेच वर राहूं देते. दागिन्यांपैकीं काय तो मोत्यांचा हारच तिनें आपल्या ांत राहूं दिला आहे.

यमुना—त्यांतलें इंगित आहे ठाऊक मला. धुरंधरमहाराजांना ी वस्तूंपेक्षां विलायती वस्तूंचीच आवड अधिक असायची. त्यांच्या ायती सदऱ्याच्या जोडीला चोळीपेक्षां हा पोलकाच चांगला शोभेल, णि त्यांच्या दाढीला हे मोकळे केंसच खुलून दिसतील.

गंगू—चल चावट कुठची !

यमुना—मी अशी दुसऱ्याकरितां आपल्या वस्त्रप्रावरणांत थोडाहि क करणार नाहीं. ज्याचें माझ्यावर प्रेम असेल, तो माझ्याकरितां त्यांज- हि प्रेमच करील. जो त्यांच्याकरतां मला सोडायला तयार होईल, त्याचें वर प्रेम कसचें ?

धुरंधर—धुरंधरमहाराजांवर यांचें मनापासून प्रेम दिसतें.

वाराणशी—तें कांहीं विचारूं नका. पोरीनें अलीकडे त्यांच्या जेवणहि टाकलें. सारखा त्यांचा ध्यास घेऊन बसली आहे. काय पे नशिबीं आहे कुणाला ठाऊक !

धुरंधर—सत्य संकल्पाचा दाता तो नारायण आहे. बरें, पण प्रेम बसायला त्यांना यांनीं कुठें पाहिलें होतें कीं काय ?

वाराणशी—पाहणार कुठून ? त्यांचें चित्र आणि लोकांच्या तें वर्णनें, यांनींच हिला वेड लाविलें आहे.

धुरंधर—मोठा चमत्कारच ह्मणायचा !

यमुना—पण आतां महाराज दाढीला रजा देतील, तेव्हां हिच्या नाहींना फरक व्हायचा ?

धुरंधर—वा, यमुनाताई, तोंडांत केंसांचा फरक झाला प्रेमांतहि केंसभर अंतर पडतें वाटतें ?

गंगू—इश्श ! यमुने, कांहींच्याबाहींच तुझी थट्टा ! हं, जोशीबुवा, माझा हात, कीं मी दूर होऊं ?

धुरंधर—(गंगूचा हात पहात स्वगत) कोणाचेंहि अनुकूल सांगितलें ह्मणजे त्याजवर त्याचा पक्का विश्वास बसतो. (उघड) आ बरेंच मोठें दिसतें.

गंगू—इश्श ! श्रीमंतांपेक्षां गरिबांनाच औक्ष अधिक असतें.

यमुना—जोशीबुवा, नुसतें मोठें आयुष्य ही कांहीं महत्वाची नाहीं. तें सुखाचें कीं दुःखाचें, हें पहिल्यानें कळलें पाहिजे.

धुरंधर—हो, हेंहि खरेंच. उत्तरध्रुवाच्या रात्रीपेक्षां भूमध्यांचा दिवस पुरविला. मातुःश्रीचें सुख बरेंच दिसतें.

वाराणशी—हातच्या कांकणाला आरसा कशाला ?

धुरंधर—पित्याचें सुख फारसें दिसत नाहीं.

राणशी—जोशीबुवा,तुह्मालाहि हें कळून आलें ना ? तें सुख नाहीं हो ! खरें पाहूं गेलें तर अशा सोन्यासारख्या मुलीला चांगलें मिळविण्याची त्यांनीं नको का हो खटपट करायला ? पण स्वभाव च आळशी आणि तुसडा पडला.

रंधर—बाईसाहेब, आपण आहांत तोंपर्यंत त्यांना कशाला काळजी ला पाहिजे ? आपण सगळें पहातच आहांत. यांचा विवाह राज-यांत होण्याचा योग आहे.

ाराणशी—तुमच्या तोंडांत साखर पडो ! पण हें भाकीत जरा गुळ-तच झालें. राजाशीं लग्न होण्याचा कांहीं योग आहे का, हें स्पष्ट द्या. नाहीं तर धुरंधरमहाराजांचे भाचे पार्थिवराजहि राजघराण्यां-च आहेत.

धुरंधर—तें तूर्त कांहींच सांगतां येत नाहीं. यत्नसाध्य आहे, त्र खरें.

वाराणशी—यत्नसाध्य असेल तर त्याबद्दल खात्रीच आहे ह्मटलें चालेल. कारण आह्मी यत्न करायला कांहीं कमी का करणार आहोंत ? ऽ, अशी दूर हो आतां, आणि अशी हिरमुसली नको होऊंस गडे !

धुरंधर—आतां कोणाकोणाचा हात पहायचा राहिला आहे ? णीचा हात पाहूं ?

वाराणशी—तिचा काय हात पहायचा आहे ? असेल दहाजणीं-रखा. आणि त्यांतून घरकाम करून तिच्या हाताला ओचकारेहि पडलेले ायचे. धड रेघा दिसायच्याहि नाहींत. (विचार केल्यासारखें करून) थांबा अं, पहाच तिचा हात. ( त्रिवेणी धुरंधराच्या पुढें बसते. धर तिचा हात पाहूं लागतो. ) त्रिवेणि, तुझा हात असा कांपतो हे कां ? अशी भिऊं नकोस. तुला नवरा असा हुषार कारकून पाहून ऊं, कीं कुटुंबाचें पोट भरून दरमहा दोनचार रुपये मागेंहि टाकील.

धुरंधर—(एकीकडे) हा हात किती स्निग्ध आहे, आणि हा तरी लाजेनें किती मोहक दिसत आहे! हिचीं हीं जाडींभरडीं वस्त्रें कशींशींच दिसतात. तलम रेशमी वस्त्र ज्याप्रमाणें गोणपाटांत गुंडा त्याचप्रमाणें हिच्या नाजूक शरीराला बांड नेसविलेला आहे.

वाराणशी—हं, जोशीबुवा, तुह्मी तोंडाकडे फार वेळपहात लांत ?

धुरंधर—हातावरून ज्या गोष्टीचा निर्णय करतां येत नाहीं, तोंडावरून कधींकधीं ताबडतोब करितां येतो.

त्रिवेणी—(एकीकडे) यांच्या हातांत हात दिल्यापासून मला लाधलें नाहीं इतकें सुख होत आहे; आणि असें वाटतें, कीं प्रमाणें आपलें सारें जीवितहि यांच्याच स्वाधीन करावें; पण अभागिनीला हे विचार कशाला ? आज चार दिवस मी हे विचार टाकायला पाहतें आहें; पण संधि मिळतांच ते अगदीं उच्छृंखल

धुरंधर—हिला आईबापांचें मुळींच सुख मिळालेलें दिसत

वाराणशी—कुठून मिळणार ? लहानपणींच पोरकी झालेली आमच्या यजमानांनीं यात्रेला गेले असतां लांबची नातेवाईक जवळ बाळगिली, आणि पोटच्या लेंकराप्रमाणें वाढविली. हे ही कसे फेडते तें मात्र पहायचें आहे.

धुरंधर—( चपापून एकीकडे ) काय ? हिच्या हातावर राज

वाराणशी—कां? चपापलेतसे? कांहीं वाईट दिसलें असेल तर ठेवूं नका.आमच्या त्रिवेणीला कांहीं वाटणार नाहीं.मोठी धीराची

धुरंधर—तसें नाहीं. ह्मटलें हिलाहि राजयोग आहे.

वाराणशी—हिला आणि राजयोग ? खास तुमची दृष्टि हिला जर राजयोग तर आमच्या ह्माळसेला कां नसावा ! वाटतें, कीं आपण अजून गंगूचाच हात पहात आहोंत. अथवा ह्मणतां तेंहि खरें असेल; कारण आमची गंगू एकदां राणी झाली



धुरंधर--तसें नाहीं. म्हटलें हिलाहि राजयोग आहे. [पृष्ठ ४६.]

ती आपलें वजन खर्च करून त्रिवेणीचें पार्थिवराजाशीं लग्न जुळवायला मागेंपुढें पहाणार नाहीं. माझी बाळ मनानें मोठी उदार आहे. मग तें औदार्य कोणाला दाखवावें आणि कोणाला दाखवूं नये, याचेंहि भान तिला रहात नाहीं.

[ खंडेराव प्रवेश करितो. ]

खंडेराव—( स्वतःशीं ) तायताच्या पोरीचा ठावठिकाना आज-पोतुर लई जड लागत व्हता; पन त्येच्या बरूबर त्ये सोंगाड्याचा पत्त्या लावायाचं कामबी माज्याकड आलं, ह्ये लई ब्येस जालं. आता व्होव ततं घुसा, कोन ल्योक बोलनार ? बरं, काय त्ये सोंगाड्याला ह्मनत्यात बरं ? हं, तायत्या,–न्हव तोयत्या.

वाराणशी—यावें कोतवालसाहेब. कशी काय महाराजांकडची खबर ? खुशाल आहेत ना ?

खंडेराव—हैत ह्मनायच, न्हाइतर काय ?

वाराणशी—( भयानें ) ह्मणजे ?

खंडेराव—त्येंच्यावर जरा हाय परसंग.

गंगू—ह्मणजे ? बोला तरी लवकर !

खंडेराव—योक तोयत्या म्हाराजांची गादी अंगाखाली घालाया पगतुया. चेऱ्याह्मोऱ्यानं अक्षी म्हाराजावानीच दिसतुया ह्मनत्यात. त्येचा डाव फसवाया ह्माराजानीबी आपल्या भोवतालन अक्षी खडा प्हारा ठिवलाया.

वाराणशी—मग तुमची त्यांची गांठ पडली नाहीं ह्मणायची ?

खंडेराव—ह्यो गडी त्येंची गांट घ्येतल्याबिगार येनार व्हय ? अव, गांटीचं काय, पन म्हाराज माज्यासंग दोन सबूद बोललबी !

वाराणशी—तें कसें काय ? सांगा सगळें आह्मांला.

खंडेराव—योक प्हारवाला माजा व्हता दोस्त. त्येला दिली जरा मदत.

वाराणशी—त्याची मदत घेतली ह्मणतां ?

खंडेराव—तसं न्हव. त्येला मदत दिली—पाजली. आन् जवा गडी झिंगलाय तवा दिली त्येला झुकांडी, आन् जिन्यामंदी जाऊन उबा; आन् जवा ह्मराज जिना उतराया लागल, तवा ह्मनत्यात "कोनर त्यो हरामखोर उबा हाय ततं?" म्या जो ह्मनता सूं हांकला, तो ह्ये शेरच गांटलं.

वाराणशी—वाः, महाराज चांगलेच गोड शब्द बोलले तुमच्या

खंडेराव—बोलल त सई!

धुरंधर—( एकीकडे ) काय गप्पीदास आहे पहा! ( उघड ) महाराजांना पाहिलें ह्मणतां, ते माझ्यासारखे दिसतात का?

खंडेराव—( एकीकडे ) ह्ये मोटी पचाइत आलीया, पन् ह्यो काय दाद घेनार ह्येला? ( उघड ) काय ह्मंटलसा? तुमच्यावानी ह्म दिसत्याती म्हून? व्हय दिसत्याती. दोगांचीं त्वांडं यकावानी येक. अंतर हाय बगा. त्येंचा मुखडा दिसतुया अक्षी मदन्यावानी, आन् मुस्काट् दिसतया घुबडावानी!

धुरंधर—बरें, ऐट तरी?

खंडेराव—त्येंची हाय मरदावानी, आन् तुमची हाय मुर्दावानी

त्रिवेणी—(एकीकडे) काय मेला तोंडास येईल तें बरळत सुटला

गंगू—कोतवालसाहेब, तुमच्यासारख्या शिपाईगड्याचें बोलणें जरा स्पष्ट. पण त्यांत तथ्य कांहीं कमी नसतें हो!

धुरंधर—बरें, कोतवालसाहेब, माझी अंगलट तरी त्यांच्यासा आहे का?

वाराणशी—जोशीबुवा, उगीच कशाला आपल्याच हातानें आप अपमान करून घेतां?

खंडेराव—( एकीकडे ) कसा बोकांडी बसलाया बामन! अजून सोडीना. ( उघड ) अंगलट ह्मनतां व्हय? त्ये काई बगाया त्येंची हाय हत्तीवानी आन् तुमची हाय उटावानी.

वाराणशी—हें पहा, काय शोभा राहिली ?

खंडेराव—बाईसाब, तोयत्यासमंदानं काय बंदुबस्त कराया व्होवा, त्ये आपनास्नी आन् या गंगूताईस्नी आन् या यमुनाताईस्नीबी मला सांगायचं हाय. त्ये येकांद्या भलत्या मनुक्षाह्मोर सांगायचं वंगाळ. (एकीकडे) इक्तीं हुशारी ठिवल्याबिगार कसं व्हनार ?

वाराणशी—चला आपण तिकडेच जाऊं.

[ धुरंधर आणि त्रिवेणीशिवाय सर्व जातात.

धुरंधर—(स्वत:शीं) मला नेहमीं तोंडदेखलीं मिठीं भाषणें ऐकायची संवय. त्यामुळें हीं कठोर भाषणेंहि नावीन्यामुळें कशीं गोड वाटत आहेत! तीं ऐकून त्रिवेणीला जें दु:ख झालेलें दिसलें, त्यामुळें तर तीं भाषणें मला अमृततुल्य वाटलीं.

त्रिवेणी—आपणाला फार वाईट वाटलें असेल, नाहीं ?

धुरंधर—तूं आहेसच का येथें उभी ? मला वाटलें, कीं मी अगदीं एकटाच आहें.

त्रिवेणी—एकट्याला दुकटें असलें ह्मणजे दु:खांत सुख वाटतें, नाहीं ?

धुरंधर—आणि तुझ्यासारखी सांत्वन करणारी असली ह्मणजे तें दु:ख सुखमयच होऊन जातें. या घरांतील सगळ्या माणसांनीं जरी निंदेच्या तुफान वाऱ्यानें माझ्या हृदयसमुद्राला हलवून सोडलें, तरी तुझा एक स्नेहयुक्त शब्दच त्याचें शमन करण्याला समर्थ आहे. मला त्यांचा विशेषेंकरून राग येतो तो तुझ्यासाठीं. तुझ्यासारख्या गरीब गाईशीं अशी कसायासारखी करणी करायला त्या वाराणशीला लाज तरी कशी वाटत नाहीं ?

त्रिवेणी—त्यांच्यावर असें रागावूं नये. त्यांनीं मला आजपर्यंत खरोखरच पोटच्या मुलीसारखें केलें. अलीकडे मात्र मी कदाचित् गंगूताईच्या सुखाच्या आड येईन, अशी शंका येऊन त्या मला बरें पाहीनातशा झाल्या आहेत. त्यांना वाटतें, मी धुरंधरमहाराजांच्या दृष्टीस

पडलें, कीं ते गंगूताईस सोडून माझाच स्वीकार करतील. व पाहिलें तर गंगूताई माझ्यापेक्षां कितीतरी श्रेष्ठ आहे! तिचें रूप कडे आणि माझें कुणीकडे! जमीनअस्मानाचें अंतर!

धुरंधर—तुमच्या रूपांमध्यें आहे खरें जमीनअस्मानाचें अं

त्रिवेणी—पण तें काकूंना कुठून दिसणार? त्यांचें कितीहि तरी आईचें हृदय. त्याला अशा हजारों नसत्या शंका आल्या त नाहीं. याबद्दल मला त्यांची कींव मात्र येते; राग मुळींच येत मला जरी देवानें आईच्या प्रेमाचा अनुभव येऊं दिला नाहीं, तरी योग्यता मी जाणून आहें. काकूंनीं गंगूताईच्या हितासाठीं माझें नुकसान केलें, तरी मी त्यांना मनापासून क्षमा करीन.

धुरंधर—तुझ्या बोलण्यावरून कोणास असें वाटेल, कीं वा बाईंनीं तुला आजपर्यंत अत्यंत प्रेमानेंच वागविलें, आणि ह त्यांचा इतका कैवार घेत आहेस. जों जों तुझे त्यांच्यासंबंधाचे पणाचे उद्गार ऐकावे, तों तों त्यांच्याबद्दल कींव उत्पन्न होण्याऐवजीं मात्र वाढत जातो. अशा देवमाणसाशीं अशी राक्षसी वर्तणूक? स्त्री ह्मणून अधिक बोलतां येत नाहीं.

त्रिवेणी—तुह्मी काकूंकडे माझ्या दृष्टीनें पहाल, तर तुह्माला राग येणार नाहीं.

धुरंधर—तुझ्या दृष्टीनें पाहूं? तुझ्या दृष्टीनें जगाकडे पाहिलें त्याला स्वर्गाचें स्वरूप येईल. तुझी दृष्टि कावळ्यास कोकिळ व आणि गारगोटीस हिरकणी करील. तुझ्या दृष्टीला जगांत स्वतः वाईट असें काय दिसतें? तुला हा जो बांड नेसायला दिला तो तुला शालूप्रमाणेंच भासत असेल, नाहीं? त्रिवेणि, मला तुझ्या पाहतां येत नाहीं, याची क्षमा कर.

त्रिवेणी—त्यांना वाटतें, मला राज्याचा लोभ आहे. पण माझी किती मर्यादित आहे, हें त्यांना कसें कळावें? धुरंधरमहाराजां

लग्न करणार नाहीं, अशी शपथ जरी मीं वाहिली, तरी तें त्यांना खरें वाटणार नाहीं..

धुरंधर—आणि अशी भलती शपथ मी तुला घेऊंहि देणार नाहीं.

त्रिवेणी—(एकीकडे) एकूण यांची इच्छा मीं त्यांच्याशीं लग्न करावें अशीच दिसते. माझें दुर्दैव, दुसरें काय ?

झालसा ( प्रवेश करून )—अव जोशीबुवा, तुमाल्ही काकूबाय घरामंदी बिगीबिगी हटकत्याती.

[ धुरंधर जातो.

त्रिवेणी—( स्वतःशीं ) यांचें हृदय किती थोर आणि कोमल आहे हें ! आमची उतावळी गंगूताई आणि तो मेला कोतवाल यांना नाहीं नाहीं तसें टाकून बोललीं ! पण तें सारें विसरून यांनीं माझ्यासारख्या सामान्य मुलीच्या हेळणेबद्दल इतकी हळहळ दाखवावी, हें दुसऱ्या कशाचें लक्षण ? यांनीं औदार्याच्या भरांत मीं राणी व्हावें, अशी देखील इच्छा दर्शविली; आणि मला राजयोग आहे हें भाकितहि हजार हिश्शांनीं यांच्या उदार इच्छेचेंच अपत्य असावें. माझी इच्छा तशी नाहीं, असें मीं यांना जीव तोडतोडून सांगितलें; पण तें यांना खरें वाटेना. महाराज, आपण दूरदूरच्या ग्रहांच्या गति अचूक सांगतां;पण माझ्यासारख्या अजाण मुलीच्या हृदयाचा ओघ कोणत्या दिशेला वहात आहे, हें मात्र आपणाला उमगूं नये ना ? आपण गुरुत्वाकर्षणाच्या नियमांची मीमांसा करितां, पण हृदयाकर्षणाविषयीं आपलें इतकें अज्ञान असावें ना ? आपल्या भाकितानें मला आनंद होईल असें आपणाला वाटलें; पण त्यानें माझा उलट हिरमोड मात्र झाला! मी राज्याकरितां इतकी हपापलेली आहे,असेंच आपणाला वाटतें ना ? माझ्याबद्दल आपली इतकी हीन कल्पना असेल, तर मी आपल्या सेवेची इच्छा करितें, हें आपणाला कळल्यावर माझा आपणाला मनापासून राग येईल, नाहीं ? पण मी दुर्लभ वस्तूची इच्छा करून मनाची अशी फसवणूक तरी कां करून घ्यावी ? मला राज्ञीपद

जितकें दुर्लभ, तितकेंच त्यांचें गृहिणीपदहि आहे. चंद्राला
करायची हांव न बाळगितां केवळ त्याच्या मधुर मूर्तीच्या द
मनुष्याला जसा आनंद मानून घ्यावा लागतो, तसाच मलाहि
दर्शनमात्रानें मानिला पाहिजे. त्यांच्या दैवी प्रेमाची मला प्राप्ति
असती, तर माझ्यासारखी सुखी मीच असतें. पण माझ्या सुख
त्यांनीं आपल्या उच्च स्थानावरून ढळावें, हा विचार माझ्या
प्रेमाला मुळींच शोभण्यासारखा नाहीं.

---

# अंक दुसरा.

---

## प्रवेश पहिला.

[ एकीकडून झाळसा व दुसरीकडून श्रीपति प्रवेश करितात. ]

झाळसा—( स्वतःशीं ) आखिरला ह्यो सिरपति माझा सोद काडीत हतं आलाच कीं. ह्येची माज्यावर अक्षी दांडगी पिरित हाय. ह्येला बगुनशानी माजा जीवबी लइ खुस झालाया. ह्येनं पोश्याक्बी शिपाई-बान्याचा क्येला हाय. दिष्टबी लागायची येकांदी!

श्रीपति—झाळश्ये, मंगा मी आपल्या बासंगं या वाड्यामंदी आलो, आन् जवा तुला पगितली तवा भाईर उबा ऱ्हायलो. मनामंदी इचार क्येला, चारचौगामंदी तुला हटाकली मंजी तूं जायाचीस भिंगरीवानी पळून, आन् मंग मी काय तुज्यामागं भवऱ्यावानी धावाया लागूं ? तवा म्हटलं येकलीलाच गपकन् गाटावी. झाळश्ये, मला किती दी चुकावलस, पन आखिरला गाटलीच कीं ऱ्हाई तुला? तुजा ह्यो मुखडा बगाया म्या जीव कसा अक्षी हैरान क्येला व्हता !

झाळसा—आन् खंरर माज्यापायीं इक्ता येडा जाला व्हतास ?

श्रीपति—अक्षी तुज्या गळ्याच्यान्. ( तिच्या गळ्यास हात लावितो. ) तूं जवा तकडून निगून हकड आलीस, तवा मला कित्ती वंगाळ वाटल्या म्हून सांगूं ? आपुन दोगं मिळून ऱ्होरी करायची; ढोरं पान्यावर न्येयाची, आन् शानगोटा करायचा; आन् तूं ग्येलीस तवापस्न मला काइबी ग्वाड लागना. तुजा ह्यो चेरा डोळ्याह्मोरनं जाईना आन् सबुद कानामदून हलना. मंग इचार क्येला, परान् ग्येला तरी भेत्तर; पन तुला

अच्चील ततून हुडकुनशान् काडायची. तुज्या गळ्याच्यान्! (... हात लावितो. )

झाळसा—आज लई गळ्याच्या आना व्हातुयास ? आन् ... हातबी लावतुयास ?

श्रीपति—झाळश्ये, माजी पिरित जित्कीच्या तिक्ती हाय. ... मातुर सेरच्या वाऱ्यानं पार उडून ग्येलिया.

झाळसा—कशापायीं तूं ह्ये ह्मंतुस ?

श्रीपति—ह्ये पग, तुज्या गळ्यांत ह्यो दागिना पल्डाया.आ... माजा हात कसा ग्वाड लागनार ? तुला ह्ये पाताळ लुगडबी ... न्येसाया. मी गरीब गडी; माजी खादीची कांबरुनं तुज्या स... कशी सोबत्याल ?

झाळसा—अक्षी वंगाळ दिसत्याल ह्मंतोस ? पगूं तर.

(श्रीपतीजवळ जाऊन उभी राहते. तो तिला जवळ ओढतो...

गंगू (प्रवेश करून)—झाळसे, काय हा चावटपणा.मांडला ... बाबारे, तूं कोणीहि ऐस, पण असाच्या असा निघून जा पाहूं!

[ श्रीपति जा...

गंगू—झाळसे, तुला अशा गांवढळ माणसाशीं मैत्री करायला ... वाटली पाहिजे.

झाळसा—ताईसाब, त्यो माजी साडी पगत व्हता.

गंगू—खोटी कुठची! साडी पहावयाला इतकें खेटून कशाला ... रहायला हवें ? तें कांहीं नाहीं, यापुढें तूं याला येऊं देतां काम... राणीच्या दासीला हा अजागळ नवरा शोभेल तरी का ? काय तीह... भाषा, आणि गांवढळ रीतभात! काय तो अंगरखा,आणि काय तें ... अंगाला आणि कपड्यांना घामाची कशी घाण मारते आहे! ... शिक्षणाचा कांहीं तरी संस्कार झाला आहे का ? इश्श !

झाळसा—ताईसाब, मला लई सरम वाटतिया. येवडी चुकी ... पगा. पुना त्येच्यासंग बोलल्यें तर ह्यो कान धरा.

गंगू—शाबास झाळसे, तूं आहेसच तशी शहाणी. आतां मन घट्ट कर, आणि त्याला पार विसरून जा.

[ जातात.

---

## प्रवेश दुसरा.

पार्थिव—( स्वगत ) या नगरांतील प्रत्येक उपवर मुलीला धुरंधर आपणाला पसंत करील अशी आशा वाटत आहे, त्यामुळें आह्मां इतर वरांकडे कोणी ढुंकूनहि पहात नाहीं. एकदां धुरंधराचें लग्न झालें, ह्मणजे या बहकलेल्या मुलींचीं डोकीं जरा ताळ्यावर येतील; आणि मग आमची त्यांच्याकडे दाद लागेल. तथापि तोंपर्यंत अगदींच माशा मारीत वसून उपयोग नाहीं. कारण तसा बसलों, तर धुरंधराच्या लग्नाची मजप्रमाणेंच वाट पहात बसलेलीं वररूपीं शेंकडों गिधाडें हताश झालेल्या वधूंस भराभर उचलून नेऊन मला हात चोळीत बसण्याचा प्रसंग आणणार! ह्मणून तात्कालिक यश येण्याचा संभव नसला, तरी पुढील आशेवर दुय्यम हक्कदार ह्मणून मला प्रेमाराधना चालू ठेविलीच पाहिजे. वधूवरील हक्काच्या दृष्टीनें जरी मी दुय्यम हक्कदार झालों, तरी वधूच्या हक्काच्या दृष्टीनें मी जामीनदारच ह्मणावयाचा! जर नेमलेल्या मुदतींत धुरंधरानें प्रेम वसूल केलें नाहीं तर तें वसूल करण्याचा हक्क मला प्राप्त होणार, व जर त्यानें त्या मुदतींत प्रेम दिलें नाहीं तर तें मला द्यावें लागणार, अशा प्रकारचा दुहेरी करार मला केला पाहिजे. पण हा करार करावयाचा कुणाशीं? या शहरांत हा करार करण्याची योग्यता गंगू आणि यमुना अशा दोघींनाच काय ती आहे. दोघीजणी माझ्या सहाध्यायिनी असल्यामुळें मला त्यांच्याशीं मोकळेपणानें बोलण्यास कांहीं हरकत पडणार नाहीं. दोघीजणी सुरेख असून हुषारहि आहेत. शिवाय दोघींच्या घरीं पैसा मुबलक आहे, आणि दोघींनाहि भाऊ नाहींत. कांहीं वेडेपीर श्रीच्या बळावर स्त्री हस्तगत करायला पहातात. पण मी तर स्त्रीच्या बळावर श्री आकर्षून

 

घेणार. तरुण लोक बहुधा अल्लड असायचे ! ते प्रेम करितांना पुढचा कांहींच विचार न करितां प्रेमाबरोबर वहात जातात त्यामुळें अखेरीला सपशेल फसतात. पण मी मात्र पक्का आहें ! बाबतींप्रमाणें प्रेमांतहि पोक्त विचार करणार. जेथें पैसा असेल माझें प्रेम जडणार ! अधिक पैसा असेल तेथें अधिक नि हें उघडच आहे. मीं निवडलेल्या दोन्ही मुलींच्या घरीं सारखीच असल्यामुळें माझें प्रेम दोघींवर सारखेंच निर्मळ रहाणार. आपण बोलतां बोलतां विश्वेश्वरशास्त्र्यांच्या घरापाशीं येऊनहि कायग, कोण आहे तिकडे ?

झाळसा ( प्रवेश करून )—मी हाय.

पार्थिव—जा, गंगूला ह्मणावें कीं मी आलों आहें.

झाळसा—मी ह्मंजी कोन ?

पार्थिव—मी ह्मणजे तूं नव्हेस—मी ह्मणजे पार्थिव.

झाळसा—मंग ह्ये अदुगर का न्हाई सांगितलं?(आंत जाऊन तुमास्नी ताईसाब आमंदी बुलावल्याती.

[ ज

[ पडदा उघडतो. गंगू एका आरशासमोर बसलेली दिसते.

पार्थिव—गंगू, तुझी वेणीफणी नुकतीच आटपलेली दिसते स्त्रिया जगद्विजय करण्याकरितां रंगभूमीवर जाण्यापूर्वीं रंगपटांत भरणांनीं कशा सज्ज होतात, हें पाहण्याचें फारच थोड्यांच्या असतें. त्या दैववानांपैकींच मी एक आहें खास. रसिक प्रे आपल्या रूपाचा प्रभाव दाखविण्यापूर्वीं स्त्रियांना त्या ज्या निःपक्षपाती परीक्षकापुढें परीक्षा द्यावी लागते, तो हा आ अजून तूं दूर केला नाहींस. कटाक्षभ्रूविलासासारख्या चंचल नानीं तरुणांचीं हृदयें चंचल करण्याच्या कामीं उपयोगी प हा आरसा भंगुर कांच व चंचल पारा यांच्या योगानें ज्या कारा घडविला, तो फारच मार्मिक असला पाहिजे. पण गंगू, या आर

मदत घेऊन तुझें सौंदर्य चारुतर करण्याला अवकाश तरी आहे का ? तूं शलाकेनें कितीहि कृष्ण कज्जल आपल्या पापण्यांस लाविलेंस, तरी त्यामुळें त्या काळ्याभोर दिसण्याऐवजीं उलट धूसर दिसूं लागतात. तुझ्या शुभ्र मानेस शोभा येण्यासाठीं तूं तिजवर जो शुभ्र मोत्यांचा हार लटकावून दिला आहेस, तो त्या मानेशीं तुलना करतांना इंद्रनील मण्यांच्या हाराप्रमाणें दिसत आहे. अधराला लाली आणण्याकरितां तूं जो तांबूल भक्षण केला आहेस, त्यानें त्या अधराला कालिमा मात्र आणिली आहे. ती कालिमा आपल्या ओष्ठांनीं धुऊन टाकण्याचा ज्याचा अधिकार असेल, त्याच्यासारखा धन्य तोच !

गंगू—पार्थिवराज, तुह्मीं अगदीं मिथ्या वर्णन केलेंत हें.

पार्थिव—तूं सांगण्यापूर्वींच त्या वर्णनाचें मिथ्यात्व मला दिसून आलें. कारण माझें वर्णन ऐकतांऐकतांच लज्जेनें तुझें शुभ्रवर्ण मुख आरक्त झालें, आणि तूं आपला अधर चावल्यामुळें त्याचा रक्त वर्ण पुन्हा आरूढ झाला.

गंगू—तुह्मीं हें जें वर्णन केलेंत तें जर खरें, तर माझ्या मनोदया-प्रमाणें सारें होईल असेंच मी समजूं ना ?

पार्थिव—तूं जी जी इच्छा करशील ती ती ताबडतोब पूर्ण होईल असें समज. हा दास तुझ्या सेवेला सदैव तत्पर आहे.

गंगू—पार्थिवराज, तुह्मी आपल्या बाळपणींच्या स्नेहाला जागलेत खरे ! मग कराल का माझी कामगिरी ?

पार्थिव—कामगिरी ? कामगिरी कोणती करायची आणखी ?

गंगू—माझ्या मनांत जें अतुल प्रेम वास करीत आहे, तें त्याच्या विषयापर्यंत पोंचवाल का ?

पार्थिव—तुझ्या प्रेमाचा विषय मजशिवाय कोण असणार ?

गंगू—तुह्मी माझ्या प्रेमाचे विषय ? मीं कधींहि असें ह्मटलें नाहीं !

पार्थिव—ह्मणायलाच कशाला हवें ? तुझ्या तोंडावर तें प्रेम दिसत होतें.

5

गंगू—माझ्या तोंडावर जर तुमचा विश्वास असेल, तर मी त्याचं साफ सांगतें, कीं मला असा चहाटळपणा खपणार नाहीं ! महाराजांबरोबर स्वतःस बसवून घेतांना आपणास लाजहि वाटली आज कांहीं अमली पदार्थ प्यायलां नव्हतां ना ?

पार्थिव—जरा प्यायलों होतों खरा. तुझ्या रूपापेक्षां अधिक पदार्थ कोणता असणार ? मला क्षमा कर. मी याच पावलीं चाल

[ ज

गंगू—झाळसे, त्या जोशीबुवांना इकडे घेऊन ये पाहूं.

झाळसा—जी सरकार. ( आंत जाऊन धुरंधरासह प्रवेश

गंगू—जोशीबुवा, आपणास कां बोलाविलें हें आपणासारख्या लदर्शी पुरुषांना सांगावयास नकोच. आपण काल ह्मणालांत, मला पद यत्नसाध्य आहे ह्मणून. त्याचा काय अर्थ ?

धुरंधर—त्याचा अर्थ इतकाच, कीं तें पद मिळविण्याकरितां णिकपणाचा प्रयत्न झाला पाहिजे. तो करितांना कोणासहि उपयोगी नाहीं, आणि स्वतःस तर मुळींच फसवितां कामा तुमचें प्रेम धुरंधरमहाराजांवर आहे असा जो तुह्मीं ग्रह करून आहे, तो निखालस चुकीचा आहे. धुरंधरमहाराज आजपर्यंत वि होते, आणि तुह्मी त्यांच्यापासून हजारों कोसांच्या अंतरावर; असें तुमचें प्रेम त्यांच्यावर बसतें याचा अर्थ काय ? त्यांचें चित्र पाहून प्रेम जडलें असें ह्मणावें, तर मजवरहि तुमचें प्रेम कां जडूं नये ? कोतवालांनीं तुह्माला कांहीं जरी खोटेंनाटें सांगितलें असलें खरी गोष्ट अशी आहे, कीं माझ्या आणि धुरंधरमहाराजांच्या विलक्षण साम्य आहे; आणि या प्रकारचे उद्गार आजपर्यंत लोकांनीं काढिले आहेत. धुरंधरमहाराजांच्या गुणांवर तुह्मी लुब्ध असें ह्मणावें, तर त्यांचे कोणते गुण आजपर्यंत तुमच्या नजरेस त्यांच्याप्रमाणें इतरांचेंहि गुणवर्णन तुमच्या कर्णपथावर आलें पाहिजे. त्यांजवर नाहीं अजून तुमचें प्रेम जडलें ? त्यांच्यापेक्षां

गुण तुह्माला आधिक्यानें दिसले आहेत. मग माझ्यावर कां नाहीं तुमचें प्रेम जडत? याचें कारण एकच. धुरंधर राजा आहे, आणि मी कंगाल आहें. धुरंधरराजावर तुमचें प्रेम आहे, धुरंधरावर नाहीं. प्रेम जडतें तें अनेक कारणांमुळें जडतें. उदार अंतःकरण, असाधारण बुद्धि, अलौकिक विद्वत्ता, असामान्य पराक्रम, मनोरम सौंदर्य, मोहक वक्तृत्व हे प्रेमाचे सामान्यतः विषय होत. जों जों विषय गूढ तों तों प्रेमाची गाढता अधिक. परंतु तुमचें राज्यासारख्या सर्वांत बाह्य व आगंतुक अशा विषयावर प्रेम जडलें आहे. हें प्रेम धुरंधरावर आहे असा जो तुमचा समज आहे तो दूर करा, आणि त्याजवर निर्मल व अकृत्रिम प्रेम ठेवा; ह्मणजे तुह्माला खास यशःप्राप्ति होईल. खऱ्या प्रेमानें देवसुद्धां वश होतो, मग धुरंधर काय मनुष्यच आहे!

गंगू—काल कोतवालांनीं चालविलेल्या उपहासांत मी मिळालें, ह्मणूनच तुह्मी मला ही शिक्षा देत आहांत. माझ्या प्रेमाच्या मुळाशीं स्वार्थ नसून तुमच्या या उपदेशाच्या मुळाशीं मात्र आहे. धुरंधरमहाराजांची व तुमची योग्यता एकच, असा जर तुमचा समज झाला असेल, तर तो साफ चुकीचा आहे.

धुरंधर—माझी स्पष्टोक्ति आईबापांच्या कानांवर घालून तुह्माला त्यांजकडून मला दंडहि करवितां येईल, हें मी जाणून आहें.

गंगू—या गोष्टीचा बभ्रा झाल्यानें मजकडेच कमीपणा येणार आहे, ह्मणून मी तो करणार नाहीं अशाबद्दल खात्री असूं द्यावी.

[ जातात.

---

## प्रवेश तिसरा.

[ पार्थिव आणि यमुना. ]

पार्थिव—( स्वगत ) काल गंगूकडे जी फजिती झाली, ती माझ्या उतावळेपणानेंच झाली. यमुनेपाशीं जी प्रणययाचना करावयाची,

ती धिमेपणानें केली पाहिजे. तिनें आपलें मत स्पष्टपणें दाखविलें आपण निश्चयात्मक असें कोणतेंच धोरण स्वीकारावयाचें नाहीं. (
यमुने, काय चाललें होतें ?

यमुना—या शहरांत आज हजारों उपवर मुली जमल्या त्यांतली सर्वांत सुंदर कोण, याचा विचार करीत होतें.

पार्थिव—मग याचा इतका वेळ विचार करीत कशाला बसलें माझ्यासारख्या मार्मिकाला हें कोडें उलगडायला मुळींच वेळ

यमुना—इतका मार्मिकपणा सर्वांनींच कुठून आणायचा !

पार्थिव—मार्मिकपणा जरी असला, तरी हें कोडें सुंदर उलगडण्याच्या मार्गांत कांहीं तशाच अडचणी आहेत. या शह सर्वांत रमणीय स्त्री जरी घेतली, तरी ती स्वतःस आरशाशिवा णारच नाहीं; आणि आरशांत पाहणारास आपलें अकृत्रिम रूप तसेंच कधींच दिसत नाहीं ! एकतर नथ, गालावरील तीळ, लुग पदर उलट बाजूस दिसून मनोभंग करितात. शिवाय ज्याप्रमाणें चित्र काढवितांना मनुष्य उसनी ऐट आणून तोंडावर खोटें हास्य करितो, त्याप्रमाणें सुरूप स्त्रिया आरशासमोर आपल्या मुखावर सौंदर्य आणण्याचा प्रयत्न करितात; आणि त्यामुळें आपलें स्वा सौंदर्य त्यांना पहावयास मिळत नाहीं. सर्वांत स्वाभाविक अवस्था असते. त्या अवस्थेंत स्त्रीचे केंस बागेंतील लतांप्रमाणें कृत्रिम नसून वनलतांप्रमाणें इतस्ततः विखुरलेले असतात, अवयवांचा जाऊन त्यांच्या जागीं शैथिल्य आलें असतें, व मुखावरील लावण्य छाया जाऊन तिच्या ठिकाणीं भोळेपणा आणि लाडकेपणा दिसत विशेषेंकरून निद्रावस्थेंत रमणीस आपल्या वल्लभाचें स्वप्न पडत ह्मणजे तिच्या मुखावर जें तेज विलसत असतें, तें अनिर्वचनीय पण हें तेज पहाण्याचें तिच्या नशिबीं मात्र नसतें. अत्यंत माणसालाहि तें यत्नानें पाहतां येईल. पण या अनुपम सौंदर्याच्या

णीला मात्र वर्णनावरच आपली तहान भागवून घेतली पाहिजे. पाण्यांत राहून मासा कोरडाच !

यमुना--पण या सगळ्याचा माझ्याशीं काय संबंध ?

पार्थिव--यमुने, तुला सगळें कळून चुकलें आहे. रूपवतींना आपल्या रूपाचा प्रभाव किती आहे, हें इतरांच्या पूर्वींच कळून चुकलेलें असतें. सद्गुण विनयानें जसा खुलून दिसतो, त्याप्रमाणें रूपहि रूपवतीच्या त्याविषयींच्या अज्ञानानें विशेष खुलून दिसतें, हें माहित असल्यामुळें सुंदर पण चतुर स्त्रिया अंगीं खोटा विनय धारण करीत असतात.

यमुना--तर मग हें सारें वर्णन माझेंच होतें असें मी समजूं ?

पार्थिव--तुझ्याशिवाय या वर्णनावर दुसऱ्या कोणाचा हक्क चालणार आहे ? तुझें सौंदर्य इतर स्त्रियांच्या लावण्याहून अधिक मनोहर दिसायला आणखी एक गोष्ट तुजपाशीं आहे.

यमुना--कळूं तरी द्या ती कोणती ती ?

पार्थिव--तुझा हट्ट.

यमुना--हट्टानें माझ्या रूपांत भर ती कशी पडणार बाई ? आज तुह्मी विरोधाशिवाय बोलतच नाहीं.

पार्थिव--सांगतों कशी ती. कोणतीहि वस्तु दुःसाध्य असली ह्मणजे तिचें जितकें मूल्य वाटतें, तितकें अन्यथा वाटत नाहीं. हट्टी स्त्री इतरांपेक्षां दुर्लभच वाटावयाची.

यमुना--तुह्मांला माझा हट्टहि गुणासारखा वाटूं लागला, हें एका अर्थी बरें झालें. कारण माझ्या अंगीं हट्टाशिवाय आणखीहि बरेच दुर्गुण आहेत. ते सगळे जर माझ्या रूपांत भर टाकूं लागतील, तर तुह्मी ह्मणतां त्याप्रमाणें मी सर्वांत सुंदर खरी !

पार्थिव--सगळ्या दोषांमुळें रूपांत भर पडते, असें माझें ह्मणणें नाहीं. तर ज्या दोषांनीं सुंदर युवतीच्या स्वरूपांत क्षणोंक्षणीं मनोहर विकार दृग्गोचर होतात, त्या दोषांमुळेंच कायती भर पडते. भ्रुकुटि, नेत्र, गाल,

ओंठ, हनवटी या विकारी अवयवांची भिन्न भिन्न रचना हीच जर सर्वस्व असेल, तर ती रचना ज्या ज्या मनोविकारामुळें घडून ये तो तो नीतिदृष्ट्या कितीहि त्याज्य असला, तरी रूपरसिकाच्या दृ असतो. मग तो हृष्ट असो, क्रोध असो किंवा उपहास असो.

यमुना—मी जर सर्वांत सुंदर, तर गंगूताईची वाट काय!

पार्थिव—तिला लोक सुंदर ह्मणोत, पण मी ह्मणणार नासिका, भिंवया, कान, हनुवटी हे अवयव अमुक अमुक अं तरच ते सुरेख, अशी जर सौंदर्याची व्याख्या असती, तर गं असती खरी! पण वास्तविक पाहतां अवयवांची लांबीरुंदी मोज व ती टिपून ठेवण्याइतकें भान रसिकाच्या ठायीं राहतें, तर ते कसचें? त्याच्या मनावर रूपाचा परिणाम होतो, तो पृथक्त्वानें हो समवायानें होत असतो.

यमुना—मला हें ऐकून फार समाधान वाटलें. तर मग तुह्मी पाशीं प्रेमभिक्षा कधींच मागणार नाहीं ह्मणतां?

पार्थिव—कधीं मागितली नाहीं, आणि यापुढें मागणारहि

यमुना—हें ऐकून मला फार आनंद वाटत आहे.

पार्थिव—(एकीकडे) मीं आपल्या वक्तृत्वानें हिच्या हृदया जय मिळविला, यांत शंका नाहीं. (उघड) इतका आनंद होण्याचें

यमुना—कारण कांहीं मोठेंसें नाहीं. तुह्मी येण्यापूर्वीं मी गंगूताई दोघींपैकीं अधिक सुरेख कोण, अशाबद्दल वाद करीत तुह्मी तिच्याकडे मागणी करायला गेलां होतां, असें तिच्या बो आलें. इतक्यांत तुह्मी आलांत; तेव्हां मी तिला या दाराच्या आड इकडे आलें. आतां तुमचें बोलणें मजप्रमाणें तिनेंहि ऐकलें असेल ती माझ्यापेक्षां कमी सुरेख असून वर खोटीहि आहे, हें तिचें कळूनहि आलें असेल. थांबा, मी तिला इकडेच बोलावितें.

पार्थिव—(एकीकडे) घात झाला ! सर्वस्वीं फसलों ! (उघड) यमुने, मला एका स्नेह्याला या घटकेला—नव्हे, या क्षणीं भेटायला गेलें पाहिजे. तुझ्याशीं बोलतांना मला त्याची आठवणच नव्हती. जातों मी—

यमुना—चार पळांनीं काय होतें ? जरा थांबा.

पार्थिव—छे, क्षणभरहि थांबायची सोय नाहीं.

[ घाईघाईनें निघून जातो.

यमुना—( स्वगत ) प्रेमयाचना जिकडून व्हावीशी वाटते, तिकडून न होतां भलतीकडून झाली ह्मणजे हें असें कपाळ दुखूं लागतें.(पडद्याकडे पाहून उघड ) अग, त्या पलीकडल्या खोलींत भार्गवराव असतील,त्यांना पाठवून दे पाहूं. (भार्गव प्रवेश करितो.) यावें, गंगूताई !

भार्गव—ह्मणजे ? झालें काय ?

यमुना—दुसरें कांहीं नाहीं. ज्याच्या हृदयांत प्रेमाचा अंशहि नाहीं, असा एक बोलका भाट इतक्यांत मजकडे येऊन गेला.त्याला मीं सांगितलें, कीं पलीकडच्या खोलींत गंगूताई बसली आहे.आपण तिकडूनच आलांत; ह्मणून त्या नांवानें हांक मारिली, इतकेंच काय तें !

भार्गव—आपण स्त्रिया असतों तर किती चांगलें झालें असतें, असें मजप्रमाणें दुसऱ्याहि पुरुषांना वाटत असलें पाहिजे. कारण तुह्मी स्त्रिया आपल्या मैत्रिणींशीं जशा मोकळ्या मनानें वागतां, तशा आमच्याशीं मुळींच वागत नाहीं. बरें, मला बोलाविलें कशाला ?

यमुना—त्या भाटाच्या बडबडीनें जरा मस्तक दुखूं लागलें. आपणाला मस्तकाच्या निरनिराळ्या भागांचें चांगलें ज्ञान आहे, असें ऐकतें; तेव्हां माझा मस्तकशूळ शांत करण्याच्या कामीं आपला उपयोग झाला तर पहावा, ह्मणून तसदी दिली.

भार्गव—तसदी कसली ? यांत मला आनंदच आहे.पण मला जें ज्ञान आहे,त्यानें कपाळदुखी बरी करितां यावयाची नाहीं. मस्तकाच्या कोणत्या

भागांत कोणत्या मनःशक्तीचें वास्तव्य आहे, आणि ती शक्ति परिणत झाली आहे, एवढेंच कायतें मला सांगतां येईल.

यमुना—तें कसें, याचा जरा उलगडा झाल्याशिवाय मला नाहीं.

भार्गव—हें पहा, तुझ्याच मस्तकाची स्थिति आपण पाहूं या. ( डोक्यावर हात ठेवून ) हा पहा पूज्यबुद्धीचा भाग. तुझ्या डोक्यांत बुद्धीच्या नांवानें जवळजवळ पूज्यच आहे ! हें महत्त्वाकांक्षेचें याचीहि जवळजवळ तीच दशा.

यमुना—हें मात्र अगदीं खरें. मला जरी कोणीं हें राज्य दिं नको.

भार्गव—तें मला माहीत आहे. हें हट्टाचें राज्य. यानें मारे धु माजविला आहे. तूं एकदां ज्याचा नाद घेशील, तो तडीला नेल्या सोडणार नाहींस. तुझ्यापुढें इतरांची मात्रा मुळींच चालणार नाह

यमुना—हें खरें ना पण ? आपल्याहि हें लक्षांत असूं द्या.

भार्गव—हें व्यवहारज्ञान रगड आहे. हा कारस्थानीपणा; भरपू

यमुना—मी नाहीं जा आतां पाहूं देत. आपण माझ्या डोक अगदीं पृथक्करणच चालविलें आहे. तरी पण एक गोष्ट अजून आ लक्षांत आली नाहींच.

भार्गव—ती कोणती ?

यमुना—पुढें कधीं तरी सांगेन.

भार्गव—यमुने, स्त्रियांच्या गालांत जर एखाद्या मनःशक्तीचें वा असतें तर या शास्त्राचें हजारों पुरुषांनीं अध्ययन केलें असतें; त्या शक्तीचा अंदाज करण्यांत किती तरी वेळ घालविला असता.

यमुना—गालांत कल्पनाशक्ति नसते का ?

भार्गव—मुळींच नसते.

यमुना—मग कपोलकल्पित हा शब्द कसा निघाला ?

भार्गव—तो नुसता अलंकार आहे. इतर अवयवांना अलंकार असतात, त्याप्रमाणें गालाला नसतो; ह्मणून कवींनीं त्याजवर हा अलंकार चढविला आहे झालें.

यमुना—मला जर आपणाप्रमाणें मन ओळखण्याची कला अवगत असती, तर तिचा मला या घटकेस चांगलाच उपयोग करून घेतां आला असता.

भार्गव—तो कसा ?

यमुना—आपण अलीकडे फार चिंतातुर दिसतां. आपल्या चिंतेचें कारण कळण्याचें साधन मजपाशीं असतें, तर चांगलें झालें असतें.

भार्गव—माझ्या चिंतेची तुला वांटेकरीण करावी कीं नाहीं, याच विचारांत सध्यां मी आहें. ती चिंता दूर होण्याला तुझें झालें तर बरेंच साहाय्य होईल.

यमुना—मग सांगाच तर तिचें कारण.

भार्गव—मी एका मुलीच्या शोधांत आहें. तिचा पत्ता होईल तितक्या लवकर लागला पाहिजे.

यमुना—( एकीकडे ) मला वाटलेंच असें कांहीं तरी असेल ह्मणून. (उघड) तिचें नांव गांव तरी माहीत आहे का ? निदान एखादी खूण ?

भार्गव—तिच्या गळ्यांत एक जस्ती ताईत आहे.

यमुना—(एकीकडे) हे उघड उघड त्रिवेणीबद्दलच बोलत आहेत. तिच्या गळ्यांतील ताईत दिसायला स्वारीनें तिला बऱ्याच बारकाईनें निरखून पाहिलेलें दिसतें. पण असें करायला यांना कुठें बरें अवसर मिळाला असावा ? यांना तर तिचा सारखा ध्यास लागलेला दिसतो. तसाच तिलाहि यांचा लागलेला आहे कीं काय? पाहिलें पाहिजे. बरें झालें, लवकरच कळलें. (उघड ) पाहीन मी शोध करून.

भार्गव—पुरुषांपेक्षां बायकांनाच हा पत्ता लवकर लागायचा. याशिवाय आणखी एक लहान काम आहे. तुझें विश्वेश्वरशास्त्र्यांच्या वाड्यांत

बरेंच जाणें येणें आहे, आणि तुझ्या अंगीं एखाद्या मुत्सद्यास शो
कारस्थानीपणाहि आहे; तेव्हां तुला तें काम फारच सोपें जाई

यमुना--अशानें कांहीं मी हरभऱ्याच्या झाडावर चढायची
कळूं द्या कोणतें काम तें ?

भार्गव—त्या वाड्यांत हल्लीं एक ज्योतिषी उतरला आहे.

यमुना--आहे ठाऊक. त्याचा काय संबंध ?

भार्गव--तो आहे माझा निस्सीम मित्र. तरी पण त्याचा ए
दोष मला सांगितला पाहिजे. तो आहे जरा रंगेल. त्याचें जर वाड्यां
एखाद्या मुलीवर प्रेम बसलें, आणि त्याच मुलीची जर धुरंधरमहा
निवड केली, तर माझा मित्र हताश होऊन प्राणत्याग करील.

यमुना—( एकीकडे ) मित्रधर्माला चांगलेंच जागणें चाललें
त्रिवेणीविशाय गंगूताईवरहि स्वारीचा डोळा दिसतो. ( उघड )
माझी कामगिरी इतकीच ह्मणतां, कीं त्या ज्योतिष्याविरुद्ध गंगूता
बिघडवून टाकावयाचें ?

भार्गव—तूं चतुरच आहेस. मी तें आणखी काय सांगणार

यमुना—बरें, मीं त्या मुलीचा शोध लावून दिला तर मला

भार्गव—तुजवर प्राणांपेक्षांहि जास्त प्रेम करील—

यमुना—कोण ?

भार्गव—असा एक वर मीं तुजकरितां निवडून काढिला
तो तुला अर्पण करीन.

यमुना—माझ्या उठाठेवी दुसऱ्यांनीं नको करायला ! मी आहें
स्वतःचें हित पहायला.

भार्गव—बरें, ठरलें तर मग ?

यमुना—त्याची नको काळजी तुह्माला.

[ जात

---

## प्रवेश चवथा.

[ विश्वेश्वर आणि वाराणशी. ]

वाराणशी—मी काय ह्मणतें इकडे लक्ष आहे ना? ही डोक्यावर घेतलेली पोरच उद्यां राणी होऊन आपल्या डोक्यावर मिरीं वाटायला लागणार! आपला स्वभाव असेल थंड; पण माझा नाहीं, साफ सांगतें. मला हें कांहीं खपणार नाहीं. आजवर तिला खायला, प्यायला, नेसायला दिलें, वाटेल तसे लाड केले, ते स्वतःच्या पायावर धोंडा पाडून घ्यायला कीं काय? मी आपणाकडून आपणाला हजार वेळ सांगितलें, कीं ही सुस्ती बरी नाहीं ह्मणून! सुस्ती सुस्ती अशी करायची तरी कुठवर? तिला कांहीं सुमार? घराला आग लागली, तरी ह्मणे बिछान्यापर्यंत नाहीं आली अजून! कशी झाली तरी ती आपली पोटची लेंक. तिची काळजी आपणांलाच वाहिली पाहिजे. पण स्वतःच्या ऐषआरामापुढें तिची काळजी करतो कोण? नेहमीं झोंप, झोंप, झोंप! ही पहा आतांहि झोंपच चालली आहे. (विश्वेश्वरशास्त्र्याचें डोकें हलविते.) छेः बाई, भारीच पण ऐदीपणा हो! इकडून तिकडे पहायचें झालें, तरी गड्याला ह्मणाल माझें तोंड दुसरीकडे फिरीव ह्मणून!

विश्वेश्वर—झोंप घेऊन माझें नुकसान तें काय झालें?

वाराणशी—ह्मणजे? मी इतला वेळ गप्प होतें वाटतें अगदीं?

विश्वेश्वर—तूं असतेस केव्हां गप्प तर आतांच असशील?

वाराणशी—ह्मणजे माझी सारखी टकळी चालली असते, असेंच ना? बरें, तसेंच का होईना. त्या टकळीपैकीं तुह्मीं किती शब्द ऐकले?

विश्वेश्वर—तुझें सारें चऱ्हाट ऐकण्याची मुळींच जरूर नसते. कथे-प्रमाणें तुझें पुन्हा पुन्हा तेंच पालुपद येतें, त्या वेळीं मी जागा असलों ह्मणजे झालें. शिवाय ज्याप्रमाणें अंगाईच्या सुरावर तान्ह्या बाळाला गाढ झोंप येते, तशी तुझ्या टकळीच्या सुरावर मलाहि येते.

वाराणशी—वा, अगदीं कुक्कुबाळच किनई! बरें आहे. ती कारटी त्रिवेणी राणी होऊन अंमल चालवायला लागली, आपोआपच तुमच्या झोंपेचा अंमल उडेल!

विश्वेश्वर—त्रिवेणी झाली तरी ती आपल्या मुलीसारखीच ना तिचें सुख तें आपलेंच सुख ह्मणायचें!

वाराणशी—असला हा पांचट वेदांत मला नको आहे! सुख तें आपलेंच सुख. तुह्मी ह्मणतां हें जर खरें, तर मग तें तुह्मींच खाल्ल्यासारखें नाहीं का होत? मग जेवण कशाला जेवणाची गोष्ट निघाली, कीं सारें ब्रह्मज्ञान लटपटतें!

विश्वेश्वर—बरें, ह्मणणें काय तुझें?

वाराणशी—तिला घरांतून काढून द्या.

विश्वेश्वर—काय ह्मणतेस? तिला काढून लावूं? आजपर्यंत ठेवीप्रमाणें तिचें रक्षण करून अखेरीस तिचा विश्वासघात मी थंड प्रकृतीचा आहें खरा; पण तत्त्वावर गोष्ट आली ह्मणजे सारखा हट्टी मनुष्य तुला सांपडणार नाहीं. मी साफ सांगतों, कीं घराबाहेर काढण्यापेक्षां दुसरें कोणी निघून गेलें तरी मला पत्करलें

वाराणशी—मग मला निघून जायला स्पष्टच कां नाहीं सां देवारे देवा! कोण ही छळणूक! यापेक्षां डोळे कां नाहीं झांकत!

विश्वेश्वर—डोळे झांकायची माझ्याप्रमाणें तुलाहि इच्छा झाली आतां तरी माझ्या डोळेझांकीकडे डोळेझांक करशीलना?

वाराणशी—माझा चालला आहे प्राण, आणि तुमचा होतो खेळ! कुणीकडून आपल्याशीं माझी गांठ पडली देव जाणे!

विश्वेश्वर—या बाबतींत मात्र तुझें माझें मत अगदीं तंतोतंत जु आपली जन्माची गांठ पडली नसती, तर मलाहि तुजप्रमाणेंच स झालें असतें. पण करणार काय? आपल्या लोकांत अल्पस्वल्प तात्पुरत्या महत्त्वाच्या गोष्टी असतात मनुष्याच्या हातांत; पण

सारखी जन्मभर पुरणारी गोष्ट मात्र हातीं नसते. तुझे वडील माझ्या वडलांना भेटले; त्यांनीं कागदाच्या एका चिटोऱ्याची दुसऱ्या चिटोऱ्याशीं तुलना केली; तुझ्या वडलांनीं हुंडाकरणी कबूल केली, ती माझ्या वडलांना पसंत पडली; आणि अखेरीस तुला आणि मला जन्मभर झगडण्याकरितां विवाहरज्जूंनीं घट्ट आंवळून बांधलें. आगगाडीच्या डब्यांत बसणारांची जशी परस्परांशीं ओळख नसते, तशी तुझी माझीहि नव्हती. पण आगगाडीचा प्रवास असतो थोड्या पल्ल्याचा, आणि आपला आहे जन्माचा !

वाराणशी—मग नाहींना माझें ऐकायचें ?

विश्वेश्वर—हें पहा, जर त्रिवेणीला घरांतून काढून लाविलें, तर ती आयतीच धुरंधरमहाराजांच्या दृष्टीस पडायची ! तेव्हां याहि दृष्टीनें तसें होणें श्रेयस्कर नाहीं.

वाराणशी—हो, हें नव्हतें माझ्या ध्यानांत. बरें, तिला वनभोजनाच्या निमित्तानें आह्मीं जर आपल्या आरामबागेंत नेली, आणि तिला तशीच तेथें ठेवून आह्मी कोणत्या तरी निमित्तानें तिच्याशिवाय परत आलों आणि गंगूचें लग्न होईपर्यंत तिला घरीं आणलेंच नाहीं, तर तें तरी आपल्या मनास येईल का ?

विश्वेश्वर—(एकीकडे) मला तरी तेंच पाहिजे होतें.(उघड) वा:, सर्वोत्कृष्ट युक्ति काढलीस. पण तिच्याबरोबर आरामबागेंत कुणास ठेवायचें ?

वाराणशी—आपले जोशीबुवा राहतील. खरें विचाराल, तर तिचें त्यांच्याशीं लग्न झालें तरी मला त्यांत कांहीं गैर वाटणार नाहीं.

विश्वेश्वर—मलाहि त्यांत कांहीं वावगें दिसत नाहीं. बरें आहे, तूं जा आतां, आणि त्रिवेणीला इकडे धाडून दे. वनभोजनाला कोणत्या दिवशीं जावयाचें तें मी ठरवून तुला लवकरच कळवितों.मात्र मी नाहीं हो येथून हलायचा !

वाराणशी—तें कांहीं सांगायला नको.

[ जाते.

विश्वेश्वर—( स्वगत ) मनुष्याचें जीवित नेहमीं असेंच वि असावयाचें का ? त्याचा कल एका बाजूचा, तर त्याच्या भोंव प्रत्येक गोष्टीची त्याच्या विरुद्ध धांव असावयाची. आगगाडींतू करणाराला जवळची प्रत्येक वस्तु उलट गतीनें धांवतांना दिस दूरचे वृक्ष आपल्याच दिशेनें प्रवास करीत आहेत असा प्रथ होतो, पण जवळ गेल्यावर त्यांचीहि गति प्रतिकूलच दिसू तसाच प्रकार या संसाराचा आहे. मनाप्रमाणें सर्व गोष्टी घ पाहण्याची मनुष्याची हौस या जगांत पूर्ण होण्याची मुळींच आशा हेंच खरें. दिव्य वस्तूंची प्राप्ति व्हावी ह्मणून मनुष्य तरुणपणीं सारख करीत असतो. परंतु पृथ्वी आणि आकाश यांचा क्षितिजरूपी जसा प्रत्यक्ष अनुभवानें आभासरूप ठरतो, त्याप्रमाणें मनुष्याल वस्तूची प्राप्ति हीसुद्धां अखेरीस केवळ कविकल्पनाच ठरते. पण त्रिवेणी आणि यमुना इकडेच बोलत येत आहेत. त्यांच्या बोलण्यांत व्यत्यय कशाला उगीच ! त्यांचें झाल्यावर मग सावकाशीनें तरी चालेल. त्रिवेणीच्या बरोबर यमुना आली, हेंहि चांगलेंच

[ त्रिवेणी व यमुना प्रवेश करितात. ]

यमुना—गडे, काकांनीं तुला एकटीलाच बोलाविलें आहे तेंहि कांहीं महत्त्वाची गोष्ट सांगण्याकरितां; मी कशाला येऊं तुझ्याबरोबर ?

त्रिवेणी—यमुने, काय असेल तें असो. आज बाबा मला जी सांगणार आहेत, तिचा माझ्या आयुष्यावर बराच मोठा परिणाम हे अशी आपली माझी मनोदेवता मला सांगते. नाहीं तर त्यांनीं आ कधींहि मला एकटीला बोलाविलें नाहीं, तें आजच कां बो असतें ? अशा प्रसंगीं तुझ्यासारखी जिव्हाळ्याची मैत्रीण जवळ अ बरी नाहीं का ?

यमुना—गोष्ट लग्नाशिवाय दुसरी अशी कोणती असणार ! त्रि तूं या कामांत अगदींच भोळीभावडी पडलीस. तुझ्यावर किती डोळा आहे, तुला माहितहि नाहीं.

त्रिवेणी—असें काय माझें सौंदर्य लागून राहिलें आहे ?

यमुना—कमलिनीला कुठें माहित असतें, कीं आपणांत रस आहे कीं नाहीं तें ? या कामांत तिच्याभोंवतीं घिरव्या घालणारे भुंगेच तिजपेक्षां अधिक मार्मिक असतात.

त्रिवेणी—ज्या सौंदर्यानें चटोर लोकांच्या चेष्टांना पोषण मिळतें, असलें सौंदर्य नसलेलें बरें नाहीं का ?

यमुना—सौंदर्यानें बिचाऱ्यानें काय पाप केलें आहे ? आणि अशा चटोरांना भिऊन तरी कसें चालेल ? त्यांचे दांत युक्तीनें त्यांच्याच घशांत घातले, ह्मणजे फिरून आपणांला त्यांच्यापासून त्रास कसा तो होतच नाहीं. वरी आठवण झाली. त्रिवेणि, हे तुमच्या घरीं जे जोशीबुवा पाहुणे ह्मणून राहिले आहेत, त्यांची तुला कांहीं माहिती आहे का ?

त्रिवेणी—( खालीं मान घालून ) ते कुलीन आहेत, चतुर आहेत, उदार आहेत, यापलीकडे मला काय माहिती असणार ?

यमुना—( एकीकडे ) हिच्या चर्येवरून जोशीबुवांनीं आकाशांतल्या नक्षत्रांप्रमाणें पृथ्वीवरच्या नक्षत्रांसहि अंकित करण्याला सुरवात केलेली दिसते. हिचें लक्ष जोशीबुवांशिवाय इतर कोणाकडे नाहीं, हें उघड आहे. कदाचित हिची व त्यांची जोशीबुवांसंबंधानें भेट झाली असावी. विचारून पाहूं या. (उघड) बरें, त्यांचे स्नेही तुझ्या पहाण्यांत आहेत का ?

त्रिवेणी—कोण ते ?

यमुना—भार्गवराव.

त्रिवेणी—नाहीं बाई. मीं कधीं हें नांवहि ऐकिलें नाहीं; मग माहीत कुठून असणार ? यांनासुद्धां मी या चारपांच दिवसांतच पहातें आहें. या अवधींत त्यांच्याबरोबर स्नेह्यासारखें कोणीच दिसलें नाहीं.

यमुना—(एकीकडे) ते हिच्या मोहांत गुरफटण्याच्या बेतांत आहेत, हें विचारीच्या ध्यानींमनींहि नाहीं. ( उघड) हे पहा काका उभे आहेत. काका, मी आलें त्रिवेणीबरोबर तर चालेल का ?

